**राज्यसेवा परीक्षेद्वारे शासन सेवेत निवड झालेल्या अधिका-यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत (सीपीटीपी) प्रशासकीय कामकाजात पूरक ठरणारा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/ सीपीटीपी**
मंत्रालय,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-३२
दि. २१ जुलै, २०१७.

वाचा :

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि. २०/०१/२०१४
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०२१६/प्र.क्र.५८/सीपीटीपी, दि. ०४/०१/२०१७

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट -अ व गट -ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांमध्ये संघभावना निर्माण होऊन, त्यांच्यामध्ये मैत्रीपूर्ण व सौहार्दाचे नाते निर्माण व्हावे व त्यांची सर्वव्यापक जडणघडण व्हावी, यासाठी अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांप्रमाणे दोन वर्ष कालावधीचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा निर्णय उपरोक्त वाचा येथील अ.क्र. १ अन्वये घेण्यात आलेला असून तद्नुसार गट -अ व गट -ब मधील अधिकाऱ्यांचा प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे व वनामती, नागपूर येथे जून, २०१४ पासून राबविण्यात येत आहे.

२. परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षणाच्या अनुषंगाने प्रशिक्षण संस्था, संबंधित प्रशासकीय विभाग व प्रशिक्षण घेणारे परिवीक्षाधीन अधिकारी यांच्याकडून प्राप्त अभिप्रायांचा विचार करुन प्रचलित प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये सुधारणा करण्याचा निर्णय उपरोक्त वाचा येथील अ.क्र. २ अन्वये घेण्यात आला.

३. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाद्वारे परिवीक्षाधीन अधिका-यांमध्ये वैचारिक अधिष्ठानाद्वारे ज्ञान, आत्मविश्वास व सौहार्द यांची जोपासना करण्याकरीता, दोन वर्षांच्या प्रशिक्षण कालावधीत या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांसाठी प्रशासकीय कामकाजात पुरक ठरणारा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना प्रशिक्षणादरम्यान पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम पूर्ण करणे अनिवार्य करण्यात आलेले आहे. त्या धर्तीवर एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत समाविष्ट संवर्गांसाठी (राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणारे गट अ व गट ब चे अधिकारी) शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे;

**शासन निर्णय :**

१. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेव्दारे (राज्यसेवा परीक्षा २०१६ व गतवर्षी प्रशिक्षणास रुजू होण्यास मुदतवाढ घेतलेल्या उमेदवारांसाठी व यापुढे) प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत गट -अ व गट -ब मधील परिवीक्षा अधिकाऱ्यांना प्रशासनातील कामकाजास पुरक ठरेल असा मुंबई विदयापीठातर्फे दोन वर्षे कालावधीचा Master of Arts in Development Administration -M.A. (D.Adm) with Specialization (विशेषीकरणासह) हा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम विहित करण्यास याव्दारे शासन मान्यता देत आहे. सदर दोन वर्षे कालावधीचा पदव्युत्तर-पदवी अभ्यासक्रमाच्या अमंलबजावणीसाठी शासन (सामान्य प्रशासन विभाग), यशदा, पुणे व मुंबई विद्यापीठ यांच्यामध्ये त्रिपक्षीय सामंजस्य करार करण्यात आला आहे.

२. हा दोन वर्षे कालावधीचा Master of Arts in Development Administration- M.A. (D.Adm) with Specialization पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम शासन (सामान्य प्रशासन विभाग), यशदा, पुणे व मुंबई विद्यापीठाच्या तिहेरी सहकार्यातून पार पाडण्यात येईल.

३. सदर पदव्युत्तर-पदवी अभ्यासक्रमांतर्गत पदवी प्रमाणपत्रासाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत खालील नमूद सहा टप्पे संबंधित प्रशिक्षणार्थींनी पूर्ण करणे आवश्यक आहे. खालील टप्प्याचे रुपांतर प्रस्तावित अभ्यासक्रमाच्या चार सत्रांत व १०० क्रेडिटस मध्ये करण्यात येईल.

   १. पायाभूत प्रशिक्षण
   २. अनिवार्य संलग्नता
   ३. तांत्रिक प्रशिक्षण
   ४. जिल्हा संलग्नता
   ५. महाराष्ट्र व दिल्ली भेट
   ६. पुनर्विलोकन व उजळणी प्रशिक्षण टप्पा

४. पायाभूत प्रशिक्षण, अनिवार्य संलग्नता, महाराष्ट्र व दिल्ली भेट आणि पुनर्विलोकन व उजळणी प्रशिक्षण हे टप्पे सर्व संवर्गातील अधिका-यांसाठी समान असतील. तांत्रिक प्रशिक्षण, जिल्हा संलग्नता हे टप्पे प्रत्येक संवर्गासाठी विशिष्ट स्वरुपाचे असतील. उदा. महसूल संवर्गातील अधिका-यांसाठी महसूल प्रशासन (Revenue Administration) असे विशेषीकरण (Specialization) असेल तर विक्रीकर विभागातील अधिका-यांसाठी Sales Tax हे विशेषीकरण असेल.

५. सदर अभ्यासक्रमाच्या संदर्भात मुंबई विद्यापीठामार्फत तयार करण्यात आलेल्या तदर्थ अभ्यासक्रम मंडळ (Board of Studies) तसेच त्यांच्या अधिनस्त नेमण्यात आलेल्या विविध मंडळे/ उपसमित्या यांचेमार्फत अभ्यासक्रम तयार करणे, पुस्तके व वाचन साहित्याची निवड करणे, व्याख्यात्यांची निवड करणे, प्रकल्प अहवालांचे एकत्रिकरण करणे व विविध परीक्षेंद्वारे मूल्यांकन करणे व त्याचा निकाल काढणे या संबंधीची जबाबदारी पार पाडण्यात येईल .

६. **सर्व संबंधित प्रशासकीय विभाग आणि मुंबई विद्यापीठ यांच्याशी विचारविनिमय करुन सदर पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम अंतिम करण्यास आणि त्याची संपूर्ण अंमलबजावणी करण्यास यशदा, पुणे यांना याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे**. मात्र गट अ संवर्गाकरीता कार्यान्वयन यशदामार्फत व गट ब संवर्गासाठी वनामतीमार्फत कार्यान्वयन करण्यात येईल.

७. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्यसेवा परीक्षेमार्फत झालेली निवड या दोन वर्षांच्या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठीच्या प्रवेशासाठी अर्हता असेल. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षणास रुजू होणाऱ्या सर्व परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना सदर दोन वर्षांचा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम पूर्ण करणे बंधनकारक असेल.

८. सद्यःस्थितीत राबविण्यात येत असलेल्या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाअंतर्गत अभ्यासक्रमाच्या विविध टप्प्यांचे प्रस्तावित अभ्यासक्रमात सत्रनिहाय खालीलप्रमाणे रुपांतर करण्यात यावे.

| एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाचे सहा टप्पे | पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे सत्रनिहाय टप्पे |
|---|---|
| पायाभूत प्रशिक्षण | अभ्यासक्रम सत्र (semester) १ |
| तांत्रिक प्रशिक्षण | अभ्यासक्रम सत्र (semester) २ |
| अनिवार्य क्षेत्रीय संलग्नता, जिल्हा संलग्नता आणि विभागीय परीक्षा | अभ्यासक्रम सत्र (semester) ३ |
| महाराष्ट्र दर्शन, संसद संलग्नता आणि पुनर्विलोकन प्रशिक्षण कार्यक्रम | अभ्यासक्रम सत्र (semester) ४ |

९. अभ्यासक्रम सत्र (semester) १ व ४ मधील दोन लेखी परीक्षेचे विषय आणि तिसऱ्या सत्रातील अनिवार्य क्षेत्रीय संलग्नता सर्व परिविक्षा अधिकाऱ्यांसाठी समान असतील. अभ्यासक्रम सत्र (semester) २ व ३ करीता संबंधित विषय आणि अभ्यासक्रम सत्र (semester) ४ मधील प्रबंधाचे विषय संबंधित विभागांनी आवश्यकतेनुसार निश्चित करावेत व त्या विषयात प्रशिक्षणार्थींनी विशेषीकरण (Specialization) प्राप्त करणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रम सत्र (semester) ३ या सत्रात सद्य:परिस्थितीत महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणाऱ्या विभागीय परीक्षेचा समावेश करण्यात येणार असून ही परीक्षा यशदा, पुणे यांना घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. सर्व संबंधित प्रशासकीय विभागाने सद्यःस्थितीतील विभागीय परीक्षा अभ्यासक्रमाचे पुनर्विलोकन करुन विभागातील अधिकाऱ्यांना आवश्यक असलेले विभागांशी संबंधित कायदे व नियमावली यांचा अंतर्भाव असलेले ५ विषय निश्चित करावेत. सर्व संबंधित संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमात तसेच विभागीय परीक्षा नियमात विभागीय परीक्षेसंदर्भात सद्यःस्थितीत असणाऱ्या तरतूदी अधिक्रमित करुन सामान्य प्रशासन विभागाकडून एकच अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

११. मुंबई विद्यापीठाच्या मूल्यांकन पद्धतीचा अवलंब करुन घेण्यात येणाऱ्या परीक्षांती प्राप्त होणाऱ्या १६०० गुणांचे २०० गुणांमध्ये रुपांतर करुन या परीक्षेत संबंधित अधिकाऱ्यांना मिळालेले गुण तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवड प्रक्रियेत संबंधित अधिकाऱ्यांना

मिळालेले एकूण गुण (मुख्य परीक्षा आणि मुलाखतीचे गुण) यांची बेरीज करुन त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची संबंधित संवर्गातील त्या तुकडीत अंतिम सेवाजेष्ठता निश्चित करण्यात येईल. अशा प्रकारे ठरविली जाणारी अंतिम सेवाजेष्ठता पदोन्नती तसेच सेवा विषयक सर्व अनुषंगिक बाबींसाठी लागू असेल.

१२.गृह विभागाच्या अखत्यारीतील पोलीस उपअधीक्षक / सहाय्यक पोलीस आयुक्त, गट-अ अधिक्षक (राज्य उत्पादन शुल्क),गट-अ, उपअधिक्षक (राज्य उत्पादन शुल्क)गट-ब, सहायक आयुक्त (राज्य उत्पादन शुल्क),गट-ब व सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब या संवर्गातील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांचे अभ्यासक्रम सत्र (semester) २ व ३ महाराष्ट्र पोलीस अकादमी,नाशिक मार्फत पूर्ण करण्यात येईल. अभ्यासक्रम सत्र (semester) २ व ३ मध्ये वर नमूद संवर्गाचे प्रशिक्षण व परीक्षा घेण्याची जबाबदारी महाराष्ट्र पोलीस अकादमी यांचेवर निश्चित करण्यात येत आहे. यामध्ये परिवीक्षा अधिकाऱ्यांकरीता अभ्यासक्रम सत्रांचे आयोजन करणे, अंतिम परिक्षा व मौखिक चाचणी आयोजित करणे तसेच प्रशिक्षणार्थींनी सादर केलेल्या प्रकल्प अहवालांचे एकत्रीकरण व त्यांचे मूल्यांकन इ. कार्यवाही पूर्ण करुन या सर्वांचा एकत्रित अहवाल यशदाला सादर करणे याचा समावेश आहे. याबाबत महाराष्ट्र पोलीस अकादमीने यशदा संस्थेमार्फत मुंबई विदयापीठाच्या अभ्यासक्रम मंडळाचे मार्गदर्शन घ्यावे.

१३.सदर दोन वर्षांच्या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी विविध संवर्गांच्या तांत्रिक आवश्यकता व पदनिहाय जबाबदा-या विचारात घेवून संवर्गांशी संबंधीत मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील सह सचिव/उप सचिव पदावरील अधिकाऱ्यास "समन्वय अधिकारी" म्हणून नेमण्यात यावे. तसेच प्रशिक्षणाशी संबंधित विभागातील /आयुक्तालयातील /संचालनालयातील/ संस्थेत कार्यरत वरिष्ठ अधिकाऱ्याची "संपर्क अधिकारी" म्हणून तसेच परीक्षा मंडळे/ उपसमितीसाठी नेमणूक करण्यात यावी.

१४.परिवीक्षा प्रशिक्षणार्थी अधिकारी जोपर्यंन्त विहित अभ्यासक्रम पूर्ण करुन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांतर्गत सर्व परीक्षा उत्तीर्ण होत नाही तोपर्यत परिवीक्षाधीन कालावधी पूर्ण होणार नाही असे गृहित धरुन प्रशिक्षणार्थीस नियमित पदस्थापना देण्यात येणार नाही.

१५.एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमात भविष्यात अंतर्भूत होणाऱ्या संवर्गासाठीही या शासन निर्णयातील तरतूदी लागू राहतील.

१६.सदर पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी मुंबई विद्यापीठ व महाराष्ट्र शासनाने विहीत केलेली उपस्थिती अनिवार्य राहील.

१७. सदर पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या परीक्षेत अनुत्तीर्ण झाल्यास परिवीक्षाधीन अधिका-यास त्याच्या दोन वर्षांच्या परिवीक्षा कालावधीत अथवा काही अपवादात्मक परिस्थितीत शासनाने मान्यता दिल्यास एक वर्षाच्या वाढ़ीव कालावधीत सदर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे अन्यथा त्या अधिका-याचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्यात येणार नाही.

१८. पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांतर्गत ज्या परिविक्षाधीन अधिका-याची एका वर्षानंतर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निकालाद्वारे अन्य पदावर निवड झालेल्या परिवीक्षाधीन अधिका-यास

यासोबत जोडण्यात आलेल्या जोडपत्रामध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक आहे.

१९. परिवीक्षाधीन अधिका-याने २ वर्षे प्रशिक्षण व त्या कालावधीत मुंबई विद्यापीठाने नेमून दिलेले चारही अभ्यासक्रम सत्र यशस्वीरित्या पूर्ण केले असतील तर पुन्हा प्रशिक्षणास रुजू झाल्यानंतर नवीन पदाच्या अनुषंगाने यासोबत जोडण्यात आलेल्या जोडपत्रामध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रशिक्षणाच्या टप्प्यांमधून सूट देण्यात येईल परंतू अशा परिवीक्षाधीन अधिका-यांना चारही अभ्यासक्रम सत्राच्या परीक्षा पूर्ण करणे आवश्यक असेल.

२०. उपरोक्त व्यतिरीक्त अपवादात्मक परिस्थिती उद्भवल्यास निर्णय घेण्याचे अधिकार अपर मुख्य सचिव (सेवा)/ प्रधान सचिव (सेवा) यांना राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२४१३१३५१८२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mukesh Khullar

Digitally signed by Mukesh Khullar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6481e097db98eaae8b0580130544ebced12d1340cea24fcd0132235fb0c544a8, cn=Mukesh Khullar
Date: 2017.07.24 13:21:45 +05'30'

**(मुकेश खुल्लर )**
**अपर मुख्य सचिव (सेवा)**
सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ३२,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
४. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
५. अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
६. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
७. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
८. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई - ३२,
९. प्रधान सचिव (वित्त), लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई - ३२,
१०. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
११. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
१२. सचिव, आदिवासी विकास विभाग़, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
१४. कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
१५. मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१७. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.

१८. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,
१९. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,
२०. सर्व मा. विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,
२१. सर्व मा. विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,
२२. निवडणूक आयोगाद्वारे मान्यताप्राप्त सर्व राजकीय पक्षांची कार्यालये (यादीप्रमाणे)
२३. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
२४. सहसचिव(अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. उप सचिव (व्यय ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांच्याकडे त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये / प्रशिक्षण संस्था यांना शासन निर्णय अग्रेषित करण्याच्या विनंतीसह,
२७. निवडनस्ती कार्यासन सीपीटीपी/सीपीटीपी-अ/ सीपीटीपी-ब

## जोडपत्र

## विकास प्रशासनातील पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम

# एकत्रित परिवीक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत संवर्ग उन्नतीकरण

| अ. क्र. | संवर्ग उन्नतीकरण | अभ्यासक्रमात देण्यात येणारी सूट | अनिवार्य अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| १. | **गट ‘अ’ मधून गट ‘अ’ (भिन्न संवर्ग)** (उदा. उपमुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गामधून उपजिल्हाधिकारी संवर्गात उन्नतीकरण ) | पायाभूत, ५ क्षेत्रीय संलग्नता आणि दिल्ली व महाराष्ट्र दर्शन (अभ्यासक्रम १ व अभ्यासक्रम ३ मधील काही भाग) | तांत्रिक प्रशिक्षण, जिल्हा संलग्नता व पुर्नविलोकन (अभ्यासक्रम २, ३ व ४) |
| २. | **गट ‘अ’ मधून गट ‘अ’ (विशेष बाब)** (उदा. पोलीस उपअधिक्षक किंवा पोलीस अधिक्षक (विक्रीकर) संवर्गामधून गट ‘अ’ मधील संवर्गात उन्नतीकरण ) | पायाभूत प्रशिक्षण (अभ्यासक्रम १) | तांत्रिक प्रशिक्षण, ५ क्षेत्रीय संलग्नता, जिल्हा संलग्नता आणि दिल्ली व महाराष्ट्र दर्शन, आणि पुर्नविलोकन (अभ्यासक्रम २, ३ व ४) |
| ३. | **गट ‘अ’ मधून गट ‘अ’ (समान संवर्ग)** (उदा. तहसीलदार संवर्गामधून उपजिल्हाधिकारी संवर्गात उन्नतीकरण ) | पायाभूत, तांत्रिक प्रशिक्षण, ५ क्षेत्रीय संलग्नता आणि दिल्ली व महाराष्ट्र दर्शन, (अभ्यासक्रम १, २ तसेच अभ्यासक्रम ३ मधील काही भाग) | जिल्हा संलग्नता आणि पुर्नविलोकन (अभ्यासक्रम ३ व ४)चे प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल. अभ्यासक्रम सत्र ४ ची परीक्षा ऊत्तीर्ण होणे आवश्यक असून इतर परीक्षांमधून सूट देण्यात येईल. |
| ४. | **गट ‘अ’ अथवा गट ‘ब’ मधील कोणत्याही संवर्गातून गट ‘अ’ मधील पोलीस उपअधिक्षक किंवा पोलीस अधिक्षक (विक्रीकर) संवर्गात उन्नतीकरण** | पायाभूत प्रशिक्षण (अभ्यासक्रम १) | प्रशिक्षण वेळापत्रकानुसार महाराष्ट्र पोलीस ॲकॅडमी येथे |
| ५. | **गट ‘ब’ मधून गट ‘अ’ (समान संवर्ग)** (उदा. नायब तहसीलदार संवर्गामधून उपजिल्हाधिकारी / सहायक गट विकास अधिकारी संवर्गामधून उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी संवर्गात उन्नतीकरण) | पायाभूत, तांत्रिक प्रशिक्षण, ५ क्षेत्रीय संलग्नता आणि दिल्ली व महाराष्ट्र दर्शन, (अभ्यासक्रम १, २ तसेच अभ्यासक्रम ३ मधील काही भाग) | जिल्हा संलग्नता आणि पुर्नविलोकन (अभ्यासक्रम ३ व ४)चे प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल. अभ्यासक्रम सत्र ४ ची परीक्षा ऊत्तीर्ण होणे आवश्यक असून इतर परीक्षांमधून सूट देण्यात येईल. |
| ६. | **गट ‘ब’ मधून गट ‘अ’ (भिन्न संवर्ग)** (उदा. सहायक गट विकास अधिकारी संवर्गामधून उपजिल्हाधिकारी संवर्गात उन्नतीकरण) | पायाभूत प्रशिक्षण, ५ क्षेत्रीय संलग्नता आणि दिल्ली व महाराष्ट्र दर्शन (अभ्यासक्रम १ आणि अभ्यासक्रम ३ मधील काही भाग) | तांत्रिक प्रशिक्षण, जिल्हा संलग्नता आणि पुर्नविलोकन (अभ्यासक्रम २, अभ्यासक्रम ३ मधील काही भाग व अभ्यासक्रम ४) |
| ७. | **गट ‘ब’ मधून गट ‘ब’ (भिन्न संवर्ग)** (उदा. सहायक गट विकास अधिकारी संवर्गामधून नायब तहसीलदार संवर्गात उन्नतीकरण) | पायाभूत प्रशिक्षण, ५ क्षेत्रीय संलग्नता आणि दिल्ली व महाराष्ट्र दर्शन (अभ्यासक्रम १ आणि अभ्यासक्रम ३ मधील काही भाग | तांत्रिक प्रशिक्षण, जिल्हा संलग्नता आणि पुर्नविलोकन (अभ्यासक्रम २, अभ्यासक्रम ३ मधील काही भाग व अभ्यासक्रम ४) |

सूट दिलेल्या कालावधीमध्ये प्रशिक्षणार्थी अधिकारी यांनी प्रशिक्षणार्थीला सूट मिळालेल्या अवधीच्या मर्यादेत मुंबई विद्यापीठाने मान्य केलेल्या अल्प कालावधीत अभ्यासक्रम पूर्ण करणे आवश्यक राहील.